**मंत्रालय व नवीन प्रशासकीय भवन या इमारतींचे आवार व छन्न मार्ग मोकळा ठेवण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्र. शाकाजा-१११८/प्र.क्र.६२/२०१८/२२,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: १८ जानेवारी, २०२०

**वाचा:**-१) शासन परिपत्रक क्र.शाकाजा-१०९८/प्र.क्र.७५/२२,दि.१३.०९.२००१
२) शासन परिपत्रक, क्र.शाकाजा-१११८/प्र.क्र.६२/२०१८/२२,दि.०६.०३.२०१९

**शासन परिपत्रक** : -

मंत्रालय व नवीन प्रशासकीय भवन इमारतीच्या आवारात व छन्न मार्गात बऱ्याच वेळा कपाटे/ टेबले/खुर्च्या/स्टेशनरी/जुने दस्तऐवज ठेवण्यात येतात. त्यामुळे परिसर व छन्न मार्ग अस्वच्छ दिसतो व कामात व्यत्यय येतो. तसेच यामुळे सुरक्षिततेला धोका व आग प्रतिबंधक उपाययोजनेच्या कामात अडथळा येण्याची भिती आहे. यास्तव सर्व मंत्रालयीन विभागांना मंत्रालय इमारतीच्या आवारात व छन्न मार्गात कोणत्याही प्रकारची साठवणूक करण्यात येऊ नये अशा सूचना यापूर्वीच देण्यात आलेल्या आहेत. तरीही अद्यापही मंत्रालय इमारतीमधील विभागांनी याची अंमलबजावणी केलेली नाही. तसेच छन्न मार्गात टाकाऊ फर्निचर व इतर वस्तू आढळल्यास त्याबाबत संबंधित विभागांची परवानगी अथवा पूर्व सूचना दिल्याशिवाय ते उचलण्याची व शून्य मुल्यांकन गृहित धरुन त्याची विल्हेवाट लावण्याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाला पूर्ण अधिकार देण्यात आलेले आहेत. तथापि, विभागांनी छन्न मार्गात ठेवलेल्या कपाटामध्ये विभागाच्या धारीका व कागदपत्रे ठेवण्यात आली असल्याने सदर कपाटे सार्वजनिक बांधकाम विभागास हलविता येत नाहीत. यासाठी मंत्रालय मुख्य इमारत, मंत्रालय विस्तार इमारत आणि नवीन प्रशासन भवन इमारतीतील छन्न मार्गात ठेवलेली कपाटे व इतर साहित्य विभागांनी त्यांना वाटप करण्यात आलेल्या जागेमध्ये तात्काळ स्थलांतरीत करावे अथवा कपाटे मोकळी करुन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या ताब्यात दयावी अशा सचूना या परिपत्रकान्वये देण्यात येत आहेत.

२. मंत्रालय मुख्य इमारत, मंत्रालय विस्तार इमारत आणि नवीन प्रशासन भवन इमारतीमधील सर्व विभागांनी छन्न मार्गात ठेवलेली कपाटे व इतर साहित्य त्यांना वाटप करण्यात आलेल्या जागेमध्ये तात्काळ स्थलांतरीत करावीत अथवा कपाटे मोकळी करुन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या ताब्यात दयावीत.

३. मंत्रालय मुख्य इमारत, मंत्रालय विस्तार इमारत आणि नवीन प्रशासन भवन या इमारतींमधील छन्न मार्गीकेमध्ये कोणत्याही प्रकारची साठवणूक करण्यात येऊ नये.

४. मंत्रालय मुख्य इमारत, मंत्रालय विस्तार इमारत आणि नवीन प्रशासन भवन या इमारतींच्या आवारात व छन्न मार्गात कोणत्याही प्रकारची साठवणूक केली जाणार नाही यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाने दक्षता घ्यावी.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२००११८१११९३८५४०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pradnya
Prakash Sawant

Digitally signed by Pradnya Prakash Sawant
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400065, st=Maharashtra, 2.5.4.20=dcab5c13648ccfdd9424ee4584da4e72f3f6f06dfd6b1eaa220fc9de68f36473, serialNumber=5a54b6f566784edd38767190d35e061b0d62cdb5d131b68c7c1d3d9c4fff0145, cn=Pradnya Prakash Sawant
Date: 2020.01.18 11:20:40 +05'30'

**( प्र. प्र. सावंत )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
२. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
३. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. सह सचिव (का.२२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५. उप सचिव (प्रशा-४), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. अधिक्षक अभियंता,इलाखा शहर(सा.बा.)मंडळ,मुंबई-२५ मर्झबान रोड,फोर्ट,मुंबई -०१
७. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर (सा.बां.) विभाग, बांधकाम भवन, २ रा मजला, मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-०१.
८. उप अभियंता, दक्षिण (सा.बां.) उपविभाग, एम.टी.डी.सी.समोर, मादाम कामा रोड, मुंबई-३२.
९. शाखा अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय आवार, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. शाखा अभियंता (सा.बां.) बंगलो, नवीन प्रशासन भवन, तळमजला, मुंबई-३२.
११. निवडनस्ती.